# कर्नाटक सरकारचा

# भानामतीचा 'बुद्धिवादी शोध'

## प्र ८

## कर्नाटक सरकारचा भानामतीचा शास्त्रीय शोध

१९८० साली गुलबर्गा व बीदर जिल्ह्यातील अनेक गावांत भानामतीचे प्रकार वरचेवर घडू लागल्यामुळे त्याच्या बातम्या वृत्तपत्रांतून सतत प्रसिद्ध होऊ लागल्या. त्या बातम्यांच्या सातत्यामुळे वृत्तपत्रांतून उलट-सुलट चर्चाही होऊ लागली. शेवटी या प्रकरणांचा वृत्तपत्रांतून फार गवगवा झाल्यामुळे त्याचे पडसाद कर्नाटक राज्य विधान परिषदेतही उमटले आणि काही सदस्यांनी लक्ष्यवेधी सूचना मांडून सरकारला या प्रकारांची अधिकृत चौकशी करण्याचा आग्रह धरला. तदनुसार विधान परिषदेचे



सदस्य व बेंगलोर युनिव्हर्सिटीचे भूतपूर्व व्हाइस चान्सलर डॉ. एच. नरसिंहय्या (जे भानामती, चमत्कार, ज्योतिष इ. खोटे मानणारे बुद्धिवादी म्हणून ख्यातनाम आहेत.) यांच्या नेतृत्वाखाली सात विधान परिषद सदस्यांची या भानामतीच्या शास्त्रीय शोधासाठी एक समिती नेमण्यात आली. या समितीने 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ मेंटल हेल्थ अँड न्यूरोसायन्सेस' (NIMHANS) या बेंगलोर येथील विज्ञान संस्थेतील सहा लेक्चरर्स व पोस्ट मॅज्युएट रेसिडेंटस लोकांचेशी साहाय्य घेतले. याशिवाय दोन डॉक्टर्सचेही साहाय्य घेतले. गुलबर्गा व बीदर जिल्ह्यातील संबंधित

बारा गावांना या सर्व मंडळींनी प्रत्यक्ष भेट दिली व दोनशेहून अधिक लोकांच्या मुलाखती घेतल्या. पस्तपूर या खेड्यातील सदतीस

व्यक्तींच्या शरीर व मानसशास्त्रीय दृष्ट्या तपासण्या केल्या आणि १९८१ सालच्या प्रारंभी हे इतिवृत्त तयार करून प्रसिद्ध केले.




**प्रत्यक्षात कोणकोणते प्रकार घडले?**

आता या दोन जिल्ह्यातील अनेक गावात प्रत्यक्षात काय काय घडत होते, हे या समितीच्याच शब्दात पाहा -

(१) स्त्रियांचे मंगळसूत्र, बांगड्या, जोडवी, घरातील पैसे कपडे अशा वस्तू एकदम अदृश्य होत. काही कालानंतर त्या पुन्हा परतही येत.

(२) कपडे आपोआप जळत व फाडले जात.

(३) कुंकू, हळद, लिंबे (काहींत खिळे घातलेले), बिब्बे आढळून येत.

(४) घरावर दगड येऊन पडत.

(५) झाडे वाळून जात.

(६) हुमनाबाद या शहरात एक विलक्षण प्रकार घड़े तो असा एका घराचा दरवाजा जोरात ढकलला की शेजारच्या इतर दरवाजातून ढकलल्याचा आवाज निघे.

(७) एक गाय रक्तमिश्रित दूध देऊ लागली. तर आणखी एका गायीची स्तने कापल्याची आढळली. काही घरातील गाई कमी दूध देऊ लागल्या व त्यांच्या अंगावर निरनिराळ्या आकाराचे काळे डाग उमटू लागले. काही गायींचे चारा खाणे व पाणी पिणे बंद झाले.

(८) औरड गावातील एका चार महिन्याच्या बालकाच्या अंगावरही काळे डाग उमटलेले आढळले. काही माणसांच्या अंगावरही काळे डाग उमटू लागले.

## समितीचा निष्कर्ष

या भानामतीचा अभ्यास करून समितीने जो निष्कर्ष काढला आहे, तो या समितीच्याच शब्दात पाहा -

"या भानामतीचे बळी बनलेल्या बऱ्याच लोकांची सखोल तपासणी केल्यानंतर व या भानामतीच्या उपलब्ध घटनांची काळजीपूर्वक छाननी केल्यानंतर या शोधसमितीने असा एकमुखी आणि ठाम निष्कर्ष काढला आहे, की ही तथाकथित भानामती कोठल्याही अज्ञात शक्तीने घडून येत नाही." (हा निष्कर्ष समितीने अधोरेखित केला आहे.)

## समितीची शास्त्रीय जबाबदारी

अशा रीतीने ही भानामती कुठल्याही अज्ञात शक्तीने घडून येत नसेल तर कोणत्या ज्ञात शक्तीने घडून येत होती, हे सांगण्याची शास्त्रीय जबाबदारी समितीवर येऊन पडते. ती जबाबदारी समितीने व्यवस्थित पार पाडली आहे काय, असा प्रश्न आहे. ही सरकार नियुक्त समिती असल्याने म्हणजे जनतेचे प्रतिनिधी म्हणून जनतेतर्फे समितीच्या सदस्यांनी हे शोधकार्य अंगीकारलेले असल्यामुळे, या समितीवर जनतेचे अज्ञान नाहीसे करण्याची व तिचे वैज्ञानिक उद्बोधन करण्याची विशेष जबाबदारी येऊन पडते. ती तिने विशेष प्रयत्नपूर्वक पार पाडली पाहिजे हे उघड आहे. पण खेदाची गोष्ट अशी, की या समितीने या घटनांची केवळ सारवासारव केली आहे. नको त्या गोष्टींचा पाल्हाळ केला आहे; आणि पाहिजे त्या आवश्यक शास्त्रीय तपासणीसारख्या गोष्टींचा नावालाही उल्लेख नाही. तो सर्व पाल्हाळ येथे सांगून जागा अडविण्याचे कारण नाही. त्याचे सार समितीच्याच शब्दात असे "Some of the prominent causes (of Baramati) have been fear, ignorance, Superstition, personal and family prob- lems, poverty, religious feuds, and village politics." ("या भानामतीच्या कारणांपैकी प्रमुख कारणे

म्हणजे भीती, अज्ञान, अंधश्रद्धा, वैयक्तिक आणि कौटुंबिक समस्या, गरिबी, धार्मिक वैमनस्य आणि गावचे राजकारण. " )

याला म्हणतात भानामतीचा शास्त्रीय शोध । कर्नाटकाला जोडलेल्या या भूतपूर्व निजाम हैद्राबाद संस्थानातील भागात अज्ञान व गरिबी आहे, हे शोधण्यासाठी समिती नेमण्याची व जनतेचा एवढा पैसा खर्च करून इतक्या लांब जाण्याची काय जरुरी होती? गावचे राजकारण काय फक्त या भागातच चालते आणि इतर भाग काय गुण्यागोविंदाने व एकोप्याने नांदतो आहे? अंधश्रद्धा काय या भागातच आहे आणि इतरत्र तिचा मागमूसही नाही ? गरिबी आणि अज्ञान ही या भानामतीची 'प्रमुख कारणे' असतील, तर या भागापेक्षा अधिक गरीब न अधिक अज्ञानी भाग भारतात काय कमी आहेत? तेथे का भानामती आढळत नाही? भानामतीचे प्रकार खोटे असतात, हा बेंगलोरमध्ये बसून अगोदरच काढलेला निष्कर्ष वाचकांच्या व जनतेच्या माथी मारण्यासाठी या एच्. नरसिंहय्या कंपूने 'गरिबी, अज्ञान, गावचे राजकारण' यासारखी भोंगळ व अर्थहीन कारणे पुढे करून जे बुद्धिवादी राजकारण या 'शास्त्रीय' अहवालाच्या द्वारा खेळले आहे, ते त्यांच्यासारख्या बुद्धिवादाची झापडे लावलेल्या मूठभर लोकात खपेल, खऱ्या शास्त्रीय दृष्टीच्या जगात त्याची 'राजकारणा'ला शोभेल अशीच संभावना होईल, यात तिळमात्र शंका नाही.

या समितीने आपल्याला 'वैज्ञानिक शोध समिती' हा भारदस्त दर्जा मिळावा म्हणून NIMHANS च्या काही मनोव्याधी तज्ज्ञांना आपल्यात सामील करून घेतले आहे. या लोकांमध्ये यापूर्वी भानामतीचा शोध केलेली एकही व्यक्ती नव्हती, असे या सर्व लोकांचा भानामती खोटी आहे, हा निष्कर्ष पाहून निश्चित म्हणता येते. शोध समितीच्या दहा सदस्यांपैकी सहा सदस्य मनोव्याधीचा अभ्यास करणारे आहेत, ही वस्तुस्थिती या समितीचा निष्कर्ष काय असेल, हे अगोदरच जाहीर करणारी आहे. तो निष्कर्ष म्हणजे भानामतीचे प्रकार मनोव्याधीमुळे घडतात! ते कसे घडतात हे स्पष्ट करण्याऐवजी केवळ मनोव्याधी असलेल्या लोकांची एका गावातील आकडेवारी समितीने दिली आहे.

## मनोव्याधींचा व भानामतीचा निश्चित संबंध काय?

या समितीच्या अहवालात पुढील एक वाक्य आढळते. "बऱ्याचशा मानसिक व शारीरिक व्याधी डॉक्टर लोकांनी सूचना देऊन निर्माण केल्या व सूचना देऊन नाहीशाही केल्या." कोणत्या मानसिक आणि शारीरिक व्याधी ( attacks) त्यांनी निर्माण केल्या व नाहीशा केल्या हे मात्र सांगितलेले नाही भानामतीच्या प्रकारात घडलेल्याच त्या व्याधी असतील तर त्या तशा होत्या हे स्पष्ट करावयास नको काय? असे मोघम विधान करून ही भानामती केवळ 'मानसिक' आहे हा सिद्धांत वाचकांच्या गळी उतरविण्याचा कुटिल डाव समितीने खेळला आहे हे उघड आहे. अन्यथा भानामतीसारखे शरीरावर काळे डाग सूचना देऊन डॉक्टर लोकांनी उमटविले असते, तर ह्या घटनेचा खास उल्लेख केल्याशिवाय समिती राहती ना. पण असे काळे डाग सूचनेने खरोखरच उमटले असते, तर भानामतीच्या खरेपणाला पुष्टीच मिळाली असती, हे मात्र या समितीच्या लोकांना माहीत नाही कारण भानामती अज्ञात शक्तीने नव्हे तर अदृश्य शक्तीने घडत असते, हे तथाकथित मनोव्याधी तज्ज्ञांना माहीत नाही मग ही अदृश्य शक्ती जिवंत माणसाचे 'मन' असो वा मृत माणसाचे 'मन' असो, त्यामुळे काही फरक पडत नाही. पण या समितीच्या मनोव्याधीचा सिद्धांत वेगळा आहे. या समितीने मनोव्याधी झालेल्या लोकांची एका खेड्यातील आकडेवारी देऊन असे सूचित केले आहे, की जेथे भानामतीचे प्रकार जास्त तेथे मनोव्याधीग्रस्त लोकांचे प्रमाणही जास्त. पण मनोव्याधीमुळे भानामती कशी घडते, हे मात्र कुठेच स्पष्ट केलेले नाही. कदाचित हे या समितीचे 'शास्त्रीय' गुपित असावे समजा, एका खेड्यात चोऱ्या जास्त होतात असे आढळून आले. त्या कशामुळे होतात याचा शोध घेण्यासाठी त्या खेड्यात अर्धपोटी लोक किती आहेत याची आकडेवारी गोळा करणे याला चोर किंवा चोरीची कारणे शोधण्याची शास्त्रीय पद्धत म्हणता येईल काय ? नेमका असाच प्रकार या समितीने केला आहे.

मनोव्याधीमुळे भानामती घडते (मग ती कशी का घडेना) असे क्षणभर गृहीत धरू. आता मनोव्याधीमुळे भानामती घडत असेल तर भानामती घडण्यास सुरुवात

होण्यापूर्वी तेथील लोकांना मनोव्याधी नव्हत्या व एकदम त्या व्याधी त्यांना जडल्यामुळे भानामतीचे प्रकार सुरू झाले व ते प्रकार बंद झाल्याबरोबर मनोव्याधीही नाहीशा झाल्या असे समजायचे काय? मनोव्याधी भानामतीप्रमाणे अशा अचानकपणे येतात व जातात काय? वस्तुस्थिती अशी आहे की जेथे मनोव्याधीग्रस्त लोक नाहीत, अशा ठिकाणीही भानामतीचे प्रकार घडले आहेत. पण हे या समितीच्या गावीही नाही ! समितीच्या ठिकाणी शास्त्रीय दृष्टी असती, तर भानामती घडलेल्या प्रत्येक ठिकाणी मनोव्याधीग्रस्त व्यक्ती हटकून आढळून येते का, याचा तिने शोध घेतला असता. पण असा शोध करण्याचे कष्ट समितीने ( सहा मनोव्याधी तज्ज्ञ व दोन डॉक्टर असूनही) घेतलेले नाहीत. कारण भानामतीचे खरे कारण शोधणे हा या समितीचा मुळी उद्देशच नाही. तिचा उद्देश आहे भानामती खोटी वा भ्रामक आहे हे कसेही करून सिद्ध करण्याचा! पण मनोव्याधीग्रस्त लोकांचा शोध करून हा हेतू कसा साध्य होणार? तो साध्य होण्यासाठी मनोव्याधीग्रस्त लोकांना भानामतीचा भ्रम होत असतो असा सिद्धांत ठोकून द्यावा लागेल! आणि तेच या समितीने नेमके केले आहे. (वस्तुतःजिल समिती मनोव्याधी म्हणते ती मुळात पिशाच्च बाधा आहे आणि ती भानामतीमुळे होत असते. पण समितीला पिशाच्चच मान्य नसल्यामुळे त्याची बाधा कशी मान्य होणार? म्हणून त्या बाधेला 'मनोव्याधी' मानून त्या व्याधीमुळे 'भानामती' होते (भ्रम होतो) अशी उलटी कारणमीमांसा तिने स्वीकारली आहे !) 1

**समितीची भानामतीची शास्त्रीय कारणमीमांसा !**

ही भानामती प्रत्यक्ष घडताना कोणी पाहिलेली नसल्यामुळे ती घडलीच नाही असे समितीचे म्हणणे आहे ! मंगळसूत्र, बांगड्या, जोडवी, पैसे, कपडे इ. वस्तू अदृश्य झाल्या व पुन्हा आल्या हे तेथील लोकांचे म्हणणे खरे नाही! तो त्यांना झालेला भ्रम आहे आणि त्यांना तो मानसिक व्याधीमुळे झाल ! भानामतीचे 'शास्त्रीय' संशोधन करणे किती सोपे आहे पाहा. एखादी घटना प्रत्यक्षात घडली की नाही हे ठरविण्यासाठी त्या घटनेसंबंधीचे पुरावे शोधण्याची जरुरी नाही ! ती घटना घडल्याचे सांगणाऱ्यांना 'मानसिक व्याधी आहे की नाही हे पाहिले की काम झाले ! वर

म्हटल्याप्रमाणे ही सोपी 'शास्त्रीय' कारणमीमांसा सुद्धा सर्वत्र लागू होत नाही. त्यामुळे सर्व लोकांना भानामतीचा 'भ्रम' झाल्याचा समितीचा निष्कर्ष खुद्द समितीचा निकष लावूनसुद्धा निघत नाही. पण समितीला त्याची पर्वा नाही ! सर्वच घटना भ्रममूलक मानण्यातील अडचणींची समितीला जाणीव आहे.

१. याला इंग्रजीत 'To put the cart before the horse' म्हणतात. म्हणजे गाडीला बैल जुंपण्याऐवजी बैलांनाच गाडी जुंपायची ! कार्यालाच कारण मानायचे ! नाही असे नाही. उदा. झाडे वाळली आहेत ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. मग ही झाडे कशी वाळली? पारा व मोरचूद बुंध्यात घातले की झाडे वाळतात असे समिती म्हणते. कशा प्रकारची व किती झाडे वाळली व त्या प्रकारची व तितकी झाडे वाळण्यासाठी किती पारा लागतो याचा तपशील मात्र दिलेला नाही. तो मुद्दामच दिलेला नसावा असा संशय येतो. कारण तितकी झाडे वाळण्यासाठी लागणारा पारा खेड्यातील या गरीब व अज्ञानी लोकांनी कुठून मिळविला असा प्रश्न उपस्थित झाला असता आणि समितीची अडचण झाली असती। मुख्य जीवनप्रवाहापासून तुटून अलग झालेली ही अतिदूरची खेडी आहेत (remote villages cut away from the main stream of life) असे समितीच म्हणते. मग अशा मुख्य जीवनप्रवाहापासून तुटून अलग झालेल्या, अतिदूरच्या (मागासलेल्या) खेड्यातील लोकांना पारा व मोरचूद घातल्याने झाडे वाळतात हे ज्ञान कसे झाले, अशा कामासाठी त्यांनी महाग पारा कुठून व कसा मिळविला व अशा लोकांना समिती त्याच अहवालात गरीब व अज्ञानी कसे म्हणते इ. प्रश्न वाचकांपुढे उभे राहतील! पण हा भानामतीचा 'शास्त्रीय' शोध असल्याने असले प्रश्न उपस्थित करणे चुकीचे आहे ! कारण पारा घातल्याने झाडे वाळतात हे शास्त्रीय सत्य समितीला माहीत आहे की नाही, एवढीच गोष्ट महत्त्वाची आहे !

काळ्या डागांचेही असेच आहे. ते बिळ्याचे डाग आहेत. बिब्बे खेड्यात मिळतात की नाही आणि ते घालणारे मनोव्याधीग्रस्त लोक तेथे आहेत की नाहीत एवढाच प्रश्न महत्त्वाचा आहे समितीच्या मते हे लोक स्वतःच्याच अंगावर बिब्बे घालून घेतात !

कारण त्यांना काम चुकवायचे असते ! स्वतकडे लक्ष वेधून घ्यायचे असते ! इतरांची सहानुभूती मिळवायची असते ! गायींना किंवा चार महिन्याच्या मुलाला बिब्बे घालून या गोष्टी कशा साधतात? तेथे कदाचित वैर साधायचे असेल ! कदाचित धार्मिक वैमनस्यातून ते काम केलेले असेल किंवा कदाचित ते गावचे राजकारणही असेल !

गायी रक्तमिश्रित दूध देणे, कमी दूध देणे, त्यांचे चारा खाणे पाणी पिणे बंद होणे हे कशाने घडले? अहो, त्या नैसर्गिक गोष्टी आहेत त्या सगळीकडेच घडतात ! असले प्रकार घडण्याचे प्रमाण विशिष्ट ठिकाणी एकदमच का वाढले? हे मात्र विचारू नका ! एक दार खडखडले की शेजारची इतर दारे खडखडतात, हा प्रकार कशाने घडला? तो कंपनाचा प्रकार आहे! तो कंपनाचा परिणाम असेल तर इतर घरात तसा प्रकार का घडला नाही? त्याच घरात का घडला? तोही काही काळच का घडला? हे विचारू नका ! तो प्रकार कंपनाने कसा घडतो याचे प्रात्यक्षिक करून दाखवून त्या घरच्या लोकांची तशी खात्री समितीने का करून दिली नाही? हेही विचारू नका !

घरांवर दगड टाकताना दोन माणसे प्रत्यक्ष दिसली असल्याने तो प्रकार माणसांचाच आहे हे 'सिद्ध' होते काही दगड माणसांनी टाकले म्हणून सगळेच दगड माणसांनी टाकले असा निष्कर्ष कसा काय निघतो? काही डॉक्टर रोगी बरा करण्यापेक्षा पैसे उकळण्याकडे जास्त लक्ष देतात, म्हणून सगळेच डॉक्टर पैसे उकळण्याचा उद्योग करतात असा निष्कर्ष काढण्यासारखे हे नाही काय? भानामतीमुळे दगड पडत असल्याचे पाहून काही लोकांनी आपले शत्रुत्व साधण्यासाठी किंवा केवळ गंमत म्हणूनसुद्धा दगड टाकले असणे शक्य आहे, असे म्हणता येणार नाही काय? असले प्रश्न विचारणे म्हणजे भानामतीचा सोपा प्रश्न निष्कारण गुंतागुंतीचा करणे होय !

## कपडे कसे जळले?

कपटे कसे जळले? कोणीतरी कपडे पेटविल्याशिवाय ते जळत नाहीत किंवा त्यांना विस्तव लागल्याशिवाय ते जळत नाहीत. एका ठिकाणी चुलीजवळील कापड जळले, तर दुसऱ्या ठिकाणी दिवा ठेवण्याच्या जागी कापड जळले, यावरून हे 'सिद्ध' होते.

पण ही दोनच उदाहरणे समितीने का दिली? जेथे चूलही नाही व दिवाही नाही, अशा ठिकाणी ठेवलेले असंख्य कपडे जळले त्याचे काय ? तेही कोणीतरी पेटविल्यामुळेच जळले ! हे समितीने कसे ठरविले? हे विचारू नका ! हा शास्त्रीय शोध असल्यामुळे एक-दोन उदाहरणे निष्कर्ष काढण्यासाठी पुरेशी आहेत ! त्या एकदोन उदाहरणांमध्ये तरी खुलीतील विस्तव किंवा दिव्याची ज्योत लागल्यामुळे ते कपडे जळल्याची संबंधित लोकांना विचारून खात्री केली आहे काय ? हेही विचारू नका ! कारण कोणतीही घटना घडताना प्रत्यक्ष कोणीही पाहिलेली नाही. मग असा निष्कर्ष ही समिती कसा काढते? तेही विचारू नका ! कोणतीही वस्तू विस्तव लागल्याशिवाय जळत नाही, हा शास्त्रीय सिद्धांत त्यासाठी पुरेसा आहे! मग हा सिद्धांत बेंगलोरमधूनच का प्रसिद्ध केला नाही? तो सांगण्यासाठी जनतेचा एवढा पैसा व समितीच्या सदस्यांचा इतका वेळ खर्च करून इतक्या लांब जाण्याची काय जरुरी होती ? हे काय विचारणे ! अहो, असे केल्याशिवाय भानामती खोटी आहे, तो मनोव्याधीग्रस्त लोकांचा भ्रम आहे, हे जनतेला पटणार कसे? असा खटाटोप भानामतीच्या 'शास्त्रीय' शोधासाठी करावा लागतो ! भानामतीचा 'शास्त्रीय' शोध करण्याचा निर्णय घेणारे कर्नाटक सरकार हे पहिले सरकार असल्याबद्दल समितीने त्या सरकारचे उगीच अभिनंदन केलेले नाही !

### 'भानामतीला बळी पडलेली गावे एकजात भ्रमिष्ट !' - इति समिती

या समितीने यदलापूर आणि बेनकनहळ्ळी यासारखी काही खेडी एकजात भ्रमिष्ट बनल्याचे (mass hysteria) म्हटले आहे ! भानामतीचा प्रकार मनोव्याधीमुळे होणारा भ्रम आहे, हे सिद्ध करण्यासाठी गावेच्या गावे भ्रमिष्ट ठरविणाऱ्या या समितीच्या 'वैज्ञानिक' बुद्धिमत्तेचे कौतुक करावे तितके थोडेच आहे ! समितीची ही करामत पाहून काही लोक बुद्धिवादाने सुद्धा कसे एकजात प्रमिष्ट होऊ शकतात याची प्रचिती येते. या समितीने राष्ट्रीय महामार्गावरील हुमनाबाद शहराला याच हिस्टेरियामुळे खेडे ठरविले असावे ! काही लोकांना न्यूरोटिक हिस्टेरिया होत असेल तर काही लोकांना नॅशनलिस्टिक हिस्टेरिया होतो !

## सुशिक्षित लोकसुद्धा भानामतीवर विश्वास का ठेवतात?

या समितीला सुशिक्षित लोकसुद्धा भानामतीवर विश्वास ठेवतात, ही गोष्ट फार खटकली आहे असा विश्वास ठेवून अंधश्रद्धेत ते भरच घालीत आहेत, याची समितीने खेदाने नोंद केली आहे ! सुशिक्षित लोकसुद्धा भानामतीवर विश्वास ठेवत असतील तर तो ते का ठेवतात, त्याला तसेच जबरदस्त कारण असले पाहिजे, याचा विचार करण्याची समितीला जरुरी वाटत नाही ती जरुरी का वाटत नाही याचे कारण 'शास्त्रीय' असावे! काही लोक भानामतीवर वैज्ञानिक दृष्टिकोनातून अभ्यासू लेख लिहितात हे समितीने मान्य केले असले, तरी ते लेख 'अशास्त्रीय' असल्यामुळे तेही अंधश्रद्धेत भर घालण्यास जबाबदार आहेत याचीही समितीने खेदाने नोंद केली आहे ! खरे 'शास्त्रीय' लेख अर्थात भानामती, चमत्कार, ज्योतिष, देवधर्म हे सर्व थोतांड म्हणणाऱ्या, या सर्व गोष्टींना अंधश्रद्धेत ढकलणाऱ्या नरसिंहय्या आणि त्यांच्या कंपूतील लोकच लिहू जाणोत ! कारण खऱ्या शास्त्राचे 'गुपित' त्यांनाच माहीत आहे.

## शेवटी समितीचा फुगा फुटला !

असे जरी असले तरी समितीने आपल्या अहवालाच्या शेवटी अजाणतेपणे एक चूक केल्यामुळे आतापर्यंत खोटेपणाची हवा भरून फुगवलेला तिचा बुद्धिवादी भूमिकेचा फुगा फुटला आहे! भानामतीचे प्रकार बंद करण्यासाठी शेवटी समितीने भानामती किंवा चेटूक करणाऱ्यांवर कायद्याने बंदी घालावी अशी सरकारला शिफारस केली आहे! पण नग्न साधूंच्या समाजात कपड्यांवर व शिंप्यांवर बंदी घालावी असे म्हणण्यासारखे हे हास्यास्पद नाही काय? जे मुळातच खोटे आहे, अस्तित्वात नाही, त्याच्यावर बंदी कसली घालता? भानामतीवर कायद्याने बंदी घालण्याची शिफारस करून भानामती खोटी नाही, हेच समितीने अप्रत्यक्षपणे मान्य केलेले नाही काय? खरे अस्तित्व असल्याशिवाय कोणी खोट्याचा अवलंब करून लोकांची फसवणूक करणे शक्य नसल्यामुळे फसवणुकीविरुद्ध अगोदरच कायदा अस्तित्वात असताना या समितीने नवीन भानामती - कायद्याचा आग्रह धरला आहे, यावरून हा फसवणुकीचा

प्रकार नाही, हे त्यांनी मान्य केल्यासारखे होत नाही काय? आपण भानामती विरुद्धच्या खास कायद्याचा आग्रह धरून तिचे खरेपणच मान्य करीत आहोत, हे मात्र या समितीच्या 'तज्ज्ञ' सदस्यांना उमगलेले नाही ! मास हिस्टेरिया खोटा कोण म्हणेल?

## फुटलेल्या फुग्याच्याही शेवटी चिंध्या !

अधिक शहाणपणा दाखविण्यासाठी या समितीने आपण भानामतीविरुद्ध कायद्याचा आग्रह धरून ब्रिटिश पार्लमेंटचा कित्ता गिरवीत आहे, हे कर्नाटक सरकारला पटवून देण्यासाठी *ब्रिटिश पार्लमेंटने १७३५ साली Witchcraft Act (चेटूक कायदा) पास केल्याचा इतिहास नमूद केला आहे. पण हा समितीचा शहाणपणा समितीच्याच भूमिकेविरुद्ध सज्जड पुरावा सादर करणारा ठरला असल्यामुळे समितीच्या अंगलट आला आहे. कारण ब्रिटिश पार्लमेंटने चेटूक करणाऱ्यांविरुद्ध जो कायदा पास केला होता, तो चेटूक खरोखरच करण्यात येत असल्यामुळेच, म्हणजे त्यात तथ्यांश असल्यामुळेच पास केला होता उदा. लंडनच्या रॉयल सोसायटीने चेटूक प्रकारांचा जेव्हा शोध घेतला, तेव्हा तो प्रकार खरा असल्याचे पुरावे त्या सोसायटीला मिळाले. पण या समितीच्या सदस्यांना हे माहीत नाही  शत्रुपक्ष अति उत्साहाच्या भरात कधीकधी मित्र पक्षाचीच लढाई अजाणतेपणे लढतो व मित्र पक्षाला विजय मिळवून देतो असे आढळून येते. असाच प्रकार येथे समितीच्या हातून नकळत घडला आहे. पण त्यामुळे समितीच्या भूमिकेच्या (अगोदरच फुटलेल्या) फुग्याच्या शेवटी चिंध्या झाल्या आहेत ! समितीच्या बुद्धिवादी भूमिकेच्या चिंध्या करण्याचे हे काम प्रतिपक्षाने केलेले नसून स्वतःसमितीनेच ( तिला मास हिस्टेरिया झाल्यामुळे ?) केले आहे ! आणि हीच या अहवालाची सर्वात मोठी गंमत आहे.

**टीप:** (१) आमच्यावर भानामतीचा प्रयोग करावा असे आव्हान देऊनही कोणीही समितीच्या सदस्यांवर तो प्रयोग करू शकले नाही, या गोष्टीची नोंद समितीने भानामती खोटी हे दाखवून देण्यासाठी केली आहे. सत्य साईबाबांनी आपल्यासमोर विभूती चमत्कार करून दाखववावा असे आव्हान देऊनही त्यांनी तो प्रयोग केला नाही.

त्या अर्थी तो चमत्कार खोटा असे म्हणणाऱ्या एच्. नरसिंहय्यांचा हा जुनाच युक्तिवाद असून त्याची शास्त्रीय किंमत शून्य आहे. एखाद्याने एखादा प्रयोग या स्वतला सर्वज्ञ समजणाऱ्या लोकांपुढे केला नाही म्हणून तो खोटा आहे किंवा तो होऊ शकत नाही असे सिद्ध होत नाही. त्यांनी तो का केला नाही याचा विचार करण्याची गरज बुद्धिवादाच्या हिस्टेरियामुळे या लोकांना वाटत नसली, तरी तो विचार महत्त्वाचा नाही असे म्हणता येणार नाही. समितीच्या सदस्यांवर कोणीही भानामतीचा प्रयोग करू शकले नाही, ही समितीची फुशारकी रेल्वे लुटारूंनी मेल डब्यावर हल्ला केल्यानंतर 'आमच्या डब्यावर हल्ला करण्याची त्यांची हिंमत नव्हती' या इतर डब्यातील उतारूंनी मारलेल्या फुशारकीसारखी पोकळ आणि अज्ञानमूलक आहे.

(२) या समितीप्रमाणे बुद्धिवादाची झापडे न लावलेल्या हुबळीच्या 'संयुक्त कर्नाटक' या दैनिकाच्या वार्ताहराने या भानामतीचे वृत्त देताना म्हटले आहे, की मन्त्राखेळी गावचा करबसय्या भानामतीचे प्रकार त्या गावात करू लागल्यामुळे व लोकांनी तिथून त्याला पिटाळून लावल्यामुळे बीदरहून १६ कि. मी. अंतरावर असलेल्या घोडंपळी या आपल्या बायकोच्या गावात येऊन राहिला. त्या गावात तो आल्यानंतर तेथेही भानामतीचे प्रकार सुरू झाले. म्हणून त्याला लोकांनी बदडून कावले. त्यात तो गतप्राण झाला. एका बाईला भानामतीच्या संशयावरून एका गावी तेथील लोकांनी मारायला सुरुवात करताच तिने चेटूक करणाऱ्या इतर व्यक्तींची नावे सांगितली. एका गावात संशयाने पोलिसांनी एका घराची झडती घेतली तेव्हा चेटूक करण्याचे पुस्तक, बाहुली इ. साहित्य तेथे सापडले. हा भाग पूर्वी हैद्राबाद संस्थानात होता व तो चेटूक प्रकारासाठी प्रसिद्ध आहे. निजाम सरकारने चेटूक करणाऱ्यांवर कडक कारवाईचे आदेश दिले होते. हे प्रकार अजूनही बंद नाहीत. २१ जून १९८८ च्या 'इंडियन एक्सप्रेस'ने चेटूक प्रकारामुळे घरे आपोआप जळण्याचे ओले कपडे पेटण्याचे विचित्र प्रकार दिडगी व चित्र हैद्राबाद या बीदरहून २० कि. मी. अंतरावरील आंध्रप्रदेशातील दोन गावात घडत असल्याची यु. एन्. आय. ची बातमी दिली आहे.

(३) गुलबर्गा व बीदर जिल्ह्यातील भानामतीची लक्षणे याचा ग्रंथातील ४ या प्रकरणात वर्णन केलेल्या हेरवाडच्या भानामतीच्या लक्षणाशी व **विज्ञान व चमत्कार** या ग्रंथातील २ न्या प्रकरणातील रेठरे बु ।। च्या भानामतीशी कशी जुळतात हे ती प्रकरणे वाचलेल्या वाचकांच्या लक्षात आल्याशिवाय राहणार नाही. त्याच पंथात गुलबर्गा जिल्ह्यातील जीवणगी हे संपूर्ण गाव भानामतीला अलीकडेच कसे बळी पडले होते, हेही वृत्तपत्रातील बातम्यांच्या आधारे सविस्तरपणे सांगितले आहे.

---

*ब्रिटिश पार्लमेंटने 1735 साली Witchcraft Act(चेटूक कायदा) पास केला होता. तो चेटूक खरोखरच करण्यात येत असल्यामुळेच, म्हणजे त्यात तथ्यांश असल्यामुळेच पास केला होता. **Witchcraft Act 1735 - Wikipedia**